अश्वमेध क्रीडा स्पर्धा आयोजना
करिता निधी वितरण सन २०१९-२०.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१९/प्र.क्र.९०/क्रीयुसे-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३१ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा :-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्रमांक क्रीस्पर्धा १११७/प्र.क्र.११४/क्रीयुसे-२; दि. २२ फेब्रुवारी, २०१८.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१९/ प्र.क्र ९२ /अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. अश्वमेधस्पर्धा/नि.वितरण प्रस्ताव/२०१९-२०/ का-६/१६८२, दि. १६ ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये अश्वमेघ क्रीडा स्पर्धा आयोजनासाठी अटी व शर्ती निश्चित करण्यात आली असून सदर स्पर्धेसाठी प्रत्येक वर्षात आवश्यक निधी अर्थसंकल्पित करण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्याप्रमाणे संदर्भाधीन क्र.०३ च्या पत्रान्वये सन २०१९-२० या वर्षामध्ये अश्वमेघ क्रीडा स्पर्धा आयोजन करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेत सन २०१९-२० मध्ये अनुदानाच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या वर्षामध्ये अश्वमेघ क्रीडा स्पर्धा आयोजन करण्याकरिता रु.५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु. ३.०० लक्ष ( रुपये तीन लाख फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (३२) अश्वमेघ क्रीडा स्पर्धा (३२)(०१) अश्वमेघ क्रीडा स्पर्धेला वितीय सहाय्य (२२०४ २०५५), ३१ सहायक अनुदाने” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत विद्यापिठांना अनुदान मंजूर करतांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.२ मधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभाग दिनांक २१.०२.२०१९ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ८.७.२०१९ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०११२०४४३८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

APPASING RAMSING RAJPUT

Digitally signed by APPASING RAMSING RAJPUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=81c03748ea91b5ca6eb76216fadd8cfc070967b2826badc6ba66dc8151a5b97a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=02486c751e1117f7df4bdea131cc54d2a4486aa35e5ab82ce788466f2ec90916, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=APPASING RAMSING RAJPUT
Date: 2019.11.01 12:06:16 +05'30'

**( आ. रा. राजपूत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत).